महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी
योजनेतंर्गत अधिकाधिक मनुष्यदिन
रोजगार निर्मीती होण्याकरिता राज्यात
जाणीव जागृती कार्यक्रम राबविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
नियोजन विभाग (रोहयो)
शासन निर्णय क्रमांक :- नरेगा-२०१०/प्र.क्र.१४६/रोहयो-६
दिनांक :- ८ ऑक्टोबर,२०१०

**प्रस्तावना :-**महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना राज्यात प्रभावीपणे राबविण्यात येत आहे. तथापि या योजनेसाठी खर्च होणारा निधी इतर राज्यांच्या तुलनेत कमी आहे. त्यामुळे महाराष्ट्रात महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेची व्याप्ती वाढविण्यासाठी, सदर योजनेची कामे राज्यातील गोरगरीब जनतेला अधिकाधिक उपलब्ध करुन देण्यासाठी, तसेच सदर योजनेमध्ये काही सुधारणा सुचविण्यासाठी राज्य शासनाने एक मंत्रीमंडळ उपसमिती गठीत केली होती. सदर समितीने राज्य मंत्रीमंडळास केलेल्या शिफारशीनुसार राज्य मंत्रीमंडळाने दि.१२मे, २०१० रोजीच्या बैठकीत उपसमितीच्या शिफारशी मान्य केलेल्या आहेत. मंत्रीमंडळाने मान्य केलेल्या शिफारशीनुसार महाराष्ट्र शासनाने काही निधी सदर योजनेच्या प्रचार, प्रसार व जाणिवजागृतीसाठी (awareness) दिलेला आहे. महाराष्ट्रातील बहुतांश अतिदुर्गम भागातील, काही प्रमाणात इतर प्रदेशातील जनतेला अद्यापही महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेची फारशी माहिती अवगत नाही त्यामुळे मंत्रीमंडळाने सदर योजनेचा प्रचार, प्रसार व जाणीव जागृती करण्याचा निर्णय घेतला आहे. या योजनेचे मूळ उद्दिष्ट अकुशल मजुरांना ग्रामीण भागात रोजगार मिळवून देणे व कायमस्वरुपाची संसाधने निर्माण करणे असा आहे. या योजनेची माहिती राज्यातील संपूर्ण जनते पर्यंत पोहचविणे आवश्यक आहे. तसेच रोजगार निर्मिती क्षमतेचा पूर्णपणे वापर होणे आवश्यक आहे. त्यामुळे यापूर्वी सुध्दा राज्य शासनाने महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी योजनेच्या प्रसिद्धीसाठी खालीलप्रमाणे प्रयत्न केले आहेत.

१) प्रत्येक गावात दोन ठळक ठिकाणी भिंतीफलके तयार करणे.
२) राज्यस्तर, विभागीय स्तर, जिल्हास्तर, वर्तमानपत्रातून योजनेची प्रसिध्दी करणे.
३) दूरदर्शनवर प्रसिध्दी देणे.
४) आकाशवाणीवर प्रसिध्दी देणे.

५) जिल्हयाच्या ठिकाणी, तालुका ठिकाणी, शासकीय कार्यालयाच्या आवारात व बस स्थानकाच्या आवारात प्रसिध्दी फलक (होर्डींग्स) लावून प्रसिध्दी देणे.
६) महाराष्ट्र राज्य परिवहन निगम मंडळाच्या बसवर योजनेची प्रसिध्दी देणे.
७) पोस्टर्सद्वारा प्रसिध्दी देणे.
८) आदिवासी जिल्हयांमध्ये फिरत्या गाडयांद्वारे (मोबाईल व्हॅन) प्रसिध्दी करणे.
९) गावागावात रोजगार दिंडी काढणे.
१०) सर्व स्तरावर प्रशिक्षण देणे.

परंतु या योजनेची जनतेला अद्यापही पाहिजे तेवढी माहिती नसल्याने आजही या योजनेचा मोठया प्रमाणात प्रचार व प्रसार होणे आवश्यक आहे. याकरिता ग्रामपंचायत/गांव पातळीवर प्रचार व प्रसार, जाणीव जागृतीकरिता जो खर्च केला जातो त्यासोबत या योजनेचे मूळ उदिदष्ट असणा-या संसाधन निर्मितीशी (जलसंधारण, मृद्संधारण, जोडरस्ते इत्यादी कामे) व कृतीशी (performance) सांगड घातली जाणे आवश्यक आहे. या संदर्भात राज्यातील जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्याशी सविस्तर चर्चा केल्यानंतर सदर योजनेच्या प्रचार, प्रसार व जाणीव जागृती करिता पुढीलप्रमाणे कृती कार्यक्रम राबविण्याचा प्रस्ताव शासनाचा विचाराधीन होता. त्या अनुंषगाने शासनाने खालीलप्रमाणे नाविन्यपूर्ण जागृती करणेचा उपक्रम / योजना राबविण्याचा निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय** :- केंद्र शासनाचा महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी अधिनियम - २००५ संपूर्ण महाराष्ट्रात (मुंबई व मुंबई उपनगर वगळून) दिनांक १ एप्रिल, २००८ पासून लागू करण्यात आला आहे. या योजनेमध्ये केंद्र शासनाकडून व राज्य शासनाकडून निधी उपलब्ध करुन दिला जातो.

राज्यामध्ये महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत ३३ जिल्हे व सुमारे ३५० तालुके आहेत. या तालुक्यांपैकी १२५ तालुक्यांमध्ये सदर योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीकरिता लक्ष केंद्रीत करणे आवश्यक आहे. सदर तालुके जिल्हाधिका-यांकडून पुढील कसोटीच्या आधारे निवडले जावेत.

- आदिवासी , डोंगराळ , अतिदुर्गम व दुर्गम भाग.
- अवर्षण प्रवण / कमी प्रर्जन्यमानाचा प्रदेश, जेथे कृषी उत्पन्नाची शक्यता अनियमित आहे असा प्रदेश ..
- जलसिंचनाखाली न येणारा भाग

- मजुरांचे स्थलांतर होणारा भाग
- ज्या भागामध्ये योजनेला मजुरांचा प्रतिसाद मिळू शकेल अशा जिल्हयांचा भाग

ग्रामपंचायतींची निवड करताना ज्या ठिकाणी महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेची कामे अद्याप हाती घेण्यात आली नाहीत अशा ग्रामपंचायतींचा यामध्ये समावेश करावा.

प्रत्येक जिल्हयांत किती गटांची निवड करावी याबाबतचा सांख्यिकीय तक्ता व त्यासंदर्भातील खर्चाचे विवरणपत्र अनुक्रमे **प्रपत्र - अ** व **प्रपत्र-ब** अन्वये सोबत जोडले आहे..

(१) **स्वयंसेवी संस्थेची निवड**

जी स्वयंसेवी संस्था महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेविषयी व योजनेच्या अंमलबजावणी विषयी जनतेमध्ये प्रचार, प्रसार व जाणीव जागृती करण्यास इच्छुक असेल अशा स्वयंसेवी संस्थेची निवड जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील समितीने करावी. या समितीची रचना पुढीलप्रमाणे असावी..

| | |
|---|---|
| जिल्हाधिकारी | - अध्यक्ष |
| मुख्य कार्यकारी अधिकारी | - सह अध्यक्ष |
| जिल्हा समाज कल्याण अधिकारी | - सदस्य |
| जिल्हा शिक्षण अधिकारी | - सदस्य |
| प्रकल्प संचालक, जि.ग्रा.वि.यं. | - सदस्य |
| जिल्हा कृषी अधिकारी | - सदस्य |
| उप जिल्हाधिकारी (रोहयो ) | - सदस्य सचिव |

सदर समिती एखादया सामाजिक क्षेत्रातील/शैक्षणिक क्षेत्रातील तज्ञ व्यक्तीस मार्गदर्शनाकरिता पाचारण करु शकते. या समितीने स्वयंसेवी संस्थेची निवड निमंत्रित पध्दतीने करावयाची आहे. असे करताना त्या स्वयंसेवी संस्थेची सामाजिक क्षेत्रातील, गरीब लोकांकरिता काम करण्याचा अनुभव व प्रत्यक्ष या कामामध्ये स्वखुषीने भाग घेण्याची क्षमता / आवड असलेल्या स्वयंसेवी संस्थेची निवड करावी.

**(२) निवडीकरिताचे निकष**

(२.१) निवड केलेली स्वयंसेवी संस्था कमीत कमी ३ वर्षापूर्वीची नोंदणीकृत असावी. ज्या जिल्हयामध्ये स्वयंसेवी संस्था काम करण्यास इच्छुक नसतील अथवा अशा संस्थाच अस्तित्वात नसतील अथवा निवडीचे निकष पूर्ण करणारी स्वयंसेवी संस्था उपलब्ध होत नसल्यास नेहरू युवा

केंद्र, सक्षम महिला स्वयंसहायता बचत गट अथवा तत्सम इतर संस्थांच्या निवडीची उपरोक्त समितीस मुभा राहील.

(२.२) प्रौढ शिक्षण, आरोग्य शिक्षण, पुनर्वसन, जनजागृती इ. क्षेत्रांत यापूर्वी अनुभव असणा-या स्वयंसेवी संस्थाना प्राधान्य देण्यात यावे.

(२.३) सदर संस्थेचा कोणत्याही राजकीय पक्षाशी संबंध नसावा. सदर संस्था कामामध्ये रस घेणारी असावी. तसेच प्रचार , प्रसार व जाणीव जागृती सारख्या कामाची जबाबदारी घेण्यास सक्षम असावी.

**(३) स्वयंसेवी संस्थेने करावयाचे काम**

(३.१) योजनेविषयी जनजागृती मोहिमेचा कालावधी दिनांक **१ नोव्हेंबर,२०१०** ते **दिनांक ३१ मार्च,२०११** ( ५ महिने) इतका असेल.

(३.२) स्वयंसेवी संस्थेस वरील प्रकारे जिल्हाधिका-यांच्या मदतीने एका तालुक्याची निवड करता येईल. सदर संस्थेने १५ ते २५ गावांमध्ये मनुष्यदिन निर्मिती, जॉबकार्डचे अधिकाधिक रजिस्ट्रेशन व्हावे, याकरिता सर्वतोपरी प्रयत्न करणे आवश्यक राहील. स्वयंसेवी संस्थेला कमीत कमी १५ व जास्तीत जास्त २५ ग्रामपंचायतींची निवड करता येईल.

(३.३) स्वयंसेवी संस्थेने ग्रामपंचायतींची निवड करताना अशा ग्रामपंचायतींची निवड करावी की जेथे या आधी महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेचे कोणतेही काम सुरु झालेले किंवा केलेले नाही.

(३.४) याकरिता जिल्हाधिकारी व जिल्हा परिषद कार्यालयाने सर्व आवश्यक ती मदत तसेच माहिती देण्याकरिता निवड केलेल्या स्वंयसेवी संस्थेस सर्वतोपरी सहकार्य करावे.

(३.५) एका स्वयंसेवी संस्थेकडे दोन पेक्षा जास्त गट देण्यात येऊ नयेत. अपवादात्मक परिस्थितीत याबाबत जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील समितीने योग्य तो निर्णय घ्यावा.

(३.६) स्वंयसेवी संस्थांना ग्रामपंचायतींची निवड करतांना शक्यतो त्यांना जवळ-जवळच्या किंवा लगतच्याच १५ते२५ ग्रामपंचायतींची निवड करण्याची मुभा दयावी. जेणेकरून त्यांना या संदर्भात जास्तीत जास्त मनुष्यदिन रोजगार निर्मितीचे उद्दिष्ट साध्य करणे सोयीस्कर होईल.

थोडक्यात स्वयंसेवी संस्थेने महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेच्या प्रसिध्दीकरिता ग्रामपंचायतीची निवड करुन त्या ग्रामपंचायतीमध्ये प्रचार, प्रसार व जाणीव

जागृतीच्या माध्यमातून अधिकाधिक लोकांना कामावर येण्यास उद्युक्त करावे.जेणेकरुन या योजनेंच्या कामांवरील मजुरांची संख्या वाढेल व या योजनेंतर्गत घेण्यात येणा-या कामांना चालना मिळून केंद्र शासनाकडून या योजनेकरिता अधिकाधिक निधी राज्य शासनास मिळविता येईल.

**(४) स्वयंसेवी संस्थांना द्यावयाचा मोबदला**

स्वयंसेवी संस्थांना देण्यात येणारा मोबदला खालीलप्रमाणे देण्यात यावा.

(४.१) ग्रामपंचायतीच्या संख्येवर आधरित मूळ मोबदला (Core payment) :

(i) स्वयंसेवी संस्थेला योजनेच्या जनजागृतीसाठी निवडलेल्या एका ग्रामपंचायतीकरिता रु. ४,०००/- (रु. चार हजार फक्त) इतका मोबदला देण्यात यावा. तसेच जनजागृती करण्यात येणा-या एका तालुक्यातील २५ ग्रामपंचायतींचा एक गट करण्यात यावा. (रु. ४,००० x २५ ग्रामपंचायती = **रुपये १,००,०००/-**) स्थानिक कारणांमुळे स्वयंसेवी संस्थेने कमी ग्रामपंचायतींची निवड केली असल्यास ( स्वयंसेवी संस्थेने कमीत कमी १५ ग्रामपंचायती पूर्ण करणे/निवडणे आवश्यक आहे.) त्यांना त्या प्रमाणात मोबदला देण्यात यावा.

**उदाहरणार्थ :-** (१) १५ ग्रामपंचायतींकरिता १५ x रू. ४०००/- = रू. ६०,०००/- ,

(२) २० ग्रामपंचायतींकरिता २० x रू.४०००/- = रु.८०,०००/-

**किंवा**

स्वयंसेवी संस्थेस एका ग्रामपंचायतीसाठी रु. ४,०००/- याप्रमाणे ५ महिन्यासाठी (दि.१.११.२०१० ते ३१.३.२०११) रु. ८००/- प्रति महिना किंवा रु. २५/- प्रतिदिन याप्रमाणे उपलब्ध होणार आहेत म्हणून काही अपरिहार्य / स्थानिक कारणामुळे दिनांक १.११.२०१० ऐवजी उशीरा काम सुरु केले किंवा कामाचे आदेश वेळेत प्राप्त होऊनही काम उशीरा सुरु केल्यास एका ग्रामपंचायतीतील एका मनुष्यदिनामागे रु. २५ /- याप्रमाणे स्वयंसेवी संस्थेस मिळणा-या रु. १,००,०००/- एवढया मोबदल्यातून वजा करावे. **उदाहरणार्थ** :- समजा, स्वयंसेवी संस्थेस जिल्हाधिकारी यांनी कामाचे आदेश दिनांक १.११.२०१० ऐवजी दिनांक १५.११.२०१० रोजी दिल्यास त्यांना देण्यात येणा-या कामाची गणना (प्रतिदिन प्रतिग्रामपंचायत = रु. २५/-) खालीलप्रमाणे करावे.

१५ दिवस x रु. २५/- = रु. ३७५. म्हणजेच रु. ४,०००/- याप्रमाणे एका ग्रामपंचायतीसाठी स्वयंसेवी संस्थेला मिळण्याऐवजी रु. ३७५/- कमी मिळतील.

(४.२) कामाच्या प्रगतीनुसार मोबदला (Performance linked payment) **:-**

स्वंयसेवी संस्थेला कामाच्या कृतीकरिता खालीलप्रमाणे उद्दीष्ट असतील :-

(१) स्वंयसेवी संस्थेने ५ महिने कालावधीसाठी कमीत कमी १५०० मनुष्यदिन रोजगार निर्मिती एका ग्रामपंचायतींमध्ये करणे आवश्यक आहे.

(२) स्वंयसेवी संस्थेला एका ग्रामपंचायतींमध्ये २५०० मनुष्यदिन रोजगार निर्मितीचे उद्दिष्ट देण्यात यावे. म्हणजेच निवड केलेल्या स्वयंसेवी संस्थेने २५ ग्रामपंचायतींकरिता २५०० मनुष्यदिन रोजगार निर्मिती ( २५ x २५०० = ६२,५०० मनुष्यदिन रोजगार निर्मिती) ५ महिन्याकरिता करणे आवश्यक आहे. (दि. १ नोव्हेंबर, २०१० ते दि. ३१ मार्च,२०११) याकरिता त्यांना नेमून दिलेल्या ग्रामपंचायतीं अंतर्गत एकूण २५०० मनुष्यदिन रोजगारनिर्मितीचे उद्दिष्ट पूर्ण करण्याची मुभा राहील.

म्हणजेच स्वयंसेवी संस्थेने एखादया ग्रामपंचायतींतून ठरवून दिलेल्या उद्दिष्टापेक्षा जास्त (२५०० मनुष्यदिनापेक्षा अधिक) मनुष्यदिन रोजगार निर्मिती केली तरी चालेल. परंतु स्वयंसेवी संस्थेस एका ग्रामपंचायतींमध्ये कमीत कमी १५०० मनुष्यदिन रोजगार निर्मितीचे उद्दिष्ट गाठणे आवश्यक आहे. त्यानुसार २५ ग्रामपंचायतींचे मिळून ६२,५०० हे उद्दिष्ट गाठणे स्वंयसेवी संस्थेला बंधनकारक आहे.

**उदाहरणार्थ :-** जर स्वंयसेवी संस्थेने १५ ग्रामपंचायतींमध्ये २५०० मनुष्यदिन रोजगार निर्मिती केली तर १५ X २५००=३७,५०० यानुसार मनुष्यदिन रोजगार निर्मिती गणली जावी.

(४.३) <u>उद्दीष्टाप्रमाणे काम न केल्यास स्वयंसेवी संस्थेविरुध्द करावयची दंडात्मक कारवाई</u> :-

१) जर स्वयंसेवी संस्थेने ज्या ग्रामपंचायतीमध्ये मजूरांची नोंदणी करुन, जॉबकार्ड तयार करुन तसेच लोकांना सदर योजनेच्या कामासाठी उदयुक्त करुनही त्यांना निश्चित करुन दिलेले प्रत्येक ग्रामपंचायतीचे मनुष्यदिन रोजगार निर्मीतीचे उद्दिष्ट दिनांक ३१.३.२०११ पर्यंत पूर्ण केले नाहीतर किंवा पर्यायाने त्याठिकाणी प्रयत्न करुनही सदर स्वयंसेवी संस्थेस कामच सुरु करता आले नाहीतर त्यांना दिल्या जाणा-या मोबदल्यातील रु. ४,०००/- मधून रु. २,०००/- वजा करण्यात यावेत.

**किंवा**

स्वंयसेवी संस्थेने ३१ मार्च,२०११ अखेर प्रती ग्रामपंचायत किमान १५०० मनुष्यदिन रोजगार निर्मितीचे उद्दिष्ट पूर्ण न केल्यास (काम सुरु करुनही) रु. ४,०००/- (प्रति ग्रामपंचायत) मधून रु.१,०००/- वजा करण्यात यावेत.

(४.४) स्वयंसेवी संस्थेला द्यावयाचे प्रोत्साहनात्मक अनुदान / रक्कम :-

संस्थेला खालील प्रमाणे प्रोत्साहनात्मक रक्कम देय राहील.

(१) संस्थेने सरासरी पाच महिने कालावधी प्रत्येककरिता ग्रामपंचायत क्षेत्रात सरासरी २५०० मनुष्यदिन रोजगार निर्मिती केल्यास : रु. १.०० (रुपया एक फक्त) प्रती मनुष्यदिन

**उदा. :-** स्वयंसेवी संस्थेने ६२,५०० मनुष्यदिन रोजगार निर्मितीचे उद्दीष्ट पूर्ण केल्यास एक रुपया मजूरी दिवसामागे दिला जाईल. ही रक्कम त्यांना अदा केल्या जाणा-या रुपये १.०० लाख या रकमे पेक्षा अतिरिक्त असेल, म्हणजेच अशा संस्थेस २५ ग्रामपंचायतींसाठी पाच महिन्यांच्या कालावधीकरिता रुपये १,६२,५००/-अदा केले जातील.

(२) स्वंयसेवी संस्थेने २५ ग्रामपंचायत क्षेत्रात सरासरी २५०० मनुष्यदिन रोजगार निर्मिती न केल्यास. : रु.०.७५ (पंचाहत्तर पैसे फक्त)प्रती मनुष्यदिन

**उदा. :-** एखाद्या संस्थेने तीस हजार मनुष्यदिन रोजगार निर्मिती केल्यास प्रोत्साहनात्मक रक्कम ३०,०००x ०.७५ = रु. २२,५०० या प्रमाणे देय राहील.

## (५) स्वयंसेवी संस्था / सरपंच / ग्राम सेवक यांचे प्रशिक्षण

(५.१) निवड केलेल्या स्वंयसेवी संस्थांना खालीलप्रमाणे प्रशिक्षण देण्यात यांवे

**अ) जिल्हास्तरीय प्रशिक्षण :-** निवड केलेल्या स्वंयसेवी संस्थेच्या दोन प्रतिनिधीस संबंधित जिल्हयाचे उपजिल्हाधिकारी (रोहयो) यांचे मार्फत किंवा त्यांनी नियुक्त केलेल्या एखादया सक्षम अधिका-यांमार्फत जिल्हास्तरीय प्रशिक्षण देण्यात येईल. सदर प्रशिक्षणामध्ये स्वंयसेवी संस्थेच्या दोन प्रतिनिधींना महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजने संदर्भात त्यांच्याकडून शासनास काय अपेक्षित आहे या संदर्भात माहिती देण्यात यावी. सदर प्रशिक्षणाच्या खर्चासाठी रु.५,०००/- (रूपये पाच हजार फक्त) प्रति स्वंयसेवी संस्था याप्रमाणे उपजिल्हाधिकारी (रोहयो) यांना निधी मंजूर करण्यात येत आहे.

**ब) गट / तालुकास्तरीय कार्यशाळा व प्रशिक्षण :-** निवड केलेल्या स्वंयसेवी संस्थेचे दोन प्रतिनिधी व ज्या ग्रामपंचायतीमध्ये महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेचा प्रचार,

प्रसार व जाणीव जागृतीचा कार्यक्रम राबविण्यात येणार आहे अशा ग्रामपंचायतीचे सरपंच व ग्रामसेवक यांची ओळख व परिचय होण्याच्या दृष्टीने तालुक्याच्या ठिकाणी तालुकास्तरीय प्रशिक्षण कार्यशाळा आयोजित करावी.. सदर कार्यशाळा संबंधित तालुक्याचे गट विकास अधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली घेण्यात यावी. सदर तालुकास्तरीय कार्यशाळेत गट विकास अधिकारी हे त्यांना मार्गदर्शन करतील.

आयोजित केलेल्या पहिल्या कार्यशाळेत स्वंयसेवी संस्थाचे दोन प्रतिनिधी, सरपंच व ग्रामसेवक यांना महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजने संदर्भात सविस्तर माहिती देण्यात यावी. तसेच त्यांचाकडून शासनास काय अपेक्षित आहे व या योजनेसंदर्भात जास्तीत-जास्त मनुष्यदिन रोजगार निर्मीती कशी होईल याबाबत त्यांना मार्गदर्शन करावे. तालुका स्तरावर सुरुवातीला शक्य तितक्या लवकर पहिली कार्यशाळा आयोजित करावी. त्यानंतर माहे नोव्हेंबर,२०१० ते मार्च,२०११ च्या दरम्यान मध्यंतरी दुसरी प्रशिक्षण कार्यशाळा आयोजित करावी. सदरील **दोन** प्रशिक्षण कार्यशाळेच्या आयोजनासाठी गट विकास अधिकारी यांना रू. १०,०००/-(रूपये दहा हजार फक्त) प्रति स्वंयसेवी संस्था याप्रमाणे निधी मंजूर करण्यात येत आहे.

वरील जिल्हास्तरीय व तालुकास्तरीय प्रशिक्षण खर्चामध्ये स्वयंसेवी संस्थेचे प्रतिनिधी, सरपंच व ग्रामसेवक यांचा प्रवास खर्च (स्थानिक रहिवासी वगळून ) , चहा, नाश्ता, लेखन साहित्य इ. बाबींचा समावेश असेल.

**क) राज्य स्तरीय प्रशिक्षण:-** निवड केलेल्या स्वंयसेवी संस्थेच्या दोन प्रतिनिधींची माहे नोव्हेंबर, २०१० ते मार्च, २०११ या कालावधीत दोनवेळा राज्यस्तरीय बैठक आयोजित केली जाईल. सदर बैठकीच्या आयोजनाची सविस्तर माहिती नंतर उपलब्ध करून दिली जाईल.

**(६) स्वंयसेवी संस्थेस रक्कम वितरीत करावयाची कार्य पध्दती :-**

१) स्वंयसेवी संस्थेस दिली जाणारी मुळ मोबदल्याची रक्कम (Core payment)माहे नोव्हेबर, २०१० ते मार्च, २०११ दरम्यान जिल्हाधिकारी यांनी तीन हप्त्यात अदा करावी.

२) स्वंयसेवी संस्थांना दिली जाणारी प्रोत्साहनात्मक रक्कम संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांनी ३१ मार्च, २०११ अखेर मनुष्यदिन रोजगार निर्मितीनुसार माहे एप्रिल,२०११ नंतर वितरीत करावी.

३) स्वंयसेवी संस्थेला कोणत्याही परिस्थितीत अग्रीम किंवा आगाउ रक्कम देण्यात येणार नाही.

**७.** सदर कार्यक्रम राज्यात प्रभावीपणे राबविण्यासाठी येणा-या खर्चास वित्त विभागाने मंजूरी दिली आहे. यासाठी येणा-या खर्चाचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येत आहेत. तोपर्यंत सर्व जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या अध्यक्षतेखालील निवड समितीचे गठन विनाविलंब करावे व समितीने स्वयंसेवी संस्था निवडीची प्रक्रिया तात्काळ सुरु करावी.

**८.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक- ३९८/१०/व्यय-८, दिनांक- २४ सप्टेंबर, २०१०, अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

**९**. सदर शासन निर्णय राज्य शासनाच्या संकेत स्थळावर प्रसिध्द करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक क्रमांक - **२०१०१०१११८२८०४०००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

(सुरेश पेंडगांवकर)
कार्यासन अधिकारी, नियोजन विभाग (रोहयो)

प्रति,

सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी तथा जिल्हा कार्यक्रम समन्वयक,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद,
सर्व उपायुक्त / विकाअ (रोहयो)
सर्व उपजिल्हाधिकारी (रोहयो)
सर्व तहसिलदार,
सर्व गट विकास अधिकारी,
मा. मंत्री / राज्यमंत्री(रोहयो) यांचे खाजगी सचिव,
वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य मुंबई / नागपूर.
महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य मुंबई / नागपूर.
सर्व कार्यासन अधिकारी (रोहयो), नियोजन विभाग, मंत्रालय.
निवड नस्ती (रोहयो-६) / सारसंग्रह रोहयो-१.

# <u>प्रपत्र- अ</u>

## महात्मा गांधी राष्ट्रीय रोजगार हमी योजनेतंर्गत मनुष्यदिन रोजगार निर्मीतीसाठी निवड करावयाच्या गट / तालुक्याची संख्या

| अनु.क्र. | विभाग | जिल्हे | ब्लॉक संख्या |
|---|---|---|---|
| १ | कोकण | सिंधुदूर्ग | २ |
| २ | | रायगड | ३ |
| ३ | | रत्नागिरी | २ |
| ४ | | ठाणे | ५ |
| ५ | नाशिक | नाशिक | ५ |
| ६ | | धुळे | ४ |
| ७ | | नंदुरबार | ४ |
| ८ | | जळगांव | ४ |
| ९ | | अहमदनगर | ५ |
| १० | औरंगाबाद | औरंगाबाद | ५ |
| ११ | | जालना | ४ |
| १२ | | परभणी | ३ |
| १३ | | हिंगोली | ३ |
| १४ | | नांदेड | ५ |
| १५ | | बीड | ४ |
| १६ | | उस्मानाबाद | ४ |
| १७ | | लातूर | ३ |
| १८ | पुणे | पुणे | ४ |
| १९ | | सातारा | ४ |
| २० | | सांगली | ४ |
| २१ | | सोलापूर | ४ |
| २२ | | कोल्हापूर | २ |
| २३ | अमरावती | अमरावती | ५ |
| २४ | | अकोला | ४ |
| २५ | | बुलढाणा | ४ |
| २६ | | वाशिम | २ |
| २७ | | यवतमाळ | ५ |
| २८ | नागपूर | नागपूर | ४ |
| २९ | | भंडारा | ४ |
| ३० | | गोंदिया | ४ |
| ३१ | | वर्धा | ३ |
| ३२ | | चंद्रपूर | ४ |
| ३३ | | गडचिरोली | ३ |
| | | एकूण | १२५ |

**<u>प्रपत्र- ब</u>**

**महात्मा गांधी राष्ट्रीय रोजगार हमी योजनेतंर्गत मनुष्यदिन रोजगार निर्मीतीसाठी निवड केलेल्या <u>स्वयंसेवी संस्थाना दयावयाच्या मोबदल्याच्या रक्कमेचा तपशिल</u>**

१) स्वयंसेची संस्थाना दयावयाच्या मोबदल्याची रक्कम (प्रति स्वयंसेवी संस्था)= : रु. १,००,०००/-पर्यंत

२) स्वयंसेवी संस्थाना दयावयाची प्रोत्साहनात्मक रक्कम (प्रति स्वयंसेवी संस्था = : रु. ६२,५००/-

३) संबंधित जिल्हाधिकारी यांना जिल्हा स्तरीय व तालुका स्तरीय प्रशिक्षण / कार्यशाळेसाठी मंजूर करण्यात आलेली रक्कम = : रु. १५,०००/- (प्रति स्वयंसेवी संस्था)

जर स्वयंसेवी संस्थानी ३१ मार्च,२०११ अखेर ६२,५०० पेक्षा अधिक मनुष्यदिन निर्मीतीचे उद्दिष्ट पार केल्यास त्यासाठी येणारा अतिरिक्त खर्च महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेतंर्गत मंजूर असलेल्या ६ % तरतुदीतून करण्यात यावा.

*****************************